**राज्यातील ४ आकांक्षित जिल्हयांमध्ये कृषी यांत्रिकीकरण उप अभियान सन २०१८-१९ मध्ये अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी राबविण्यासाठी रु.३३३.३४ लक्ष निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०६१८/ प्र.क्र.२०२/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: १९ जुलै , २०१८.

वाचा

१) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि.२७ एप्रिल, २०१८.
२) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१३-८७/२०१६-M&T(I&P), दि २५ मे,२०१८.
३) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P), दि १२ जून,२०१८.
४) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१७/ प्र.क्र.६४/१७/१४-अे, दिनांक २७ जून, २०१८
५) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक:बीयुडी -२०१८/प्र.क्र.११/कार्यासन ६ दिनांक ७ जुलै,२०१८

प्रस्तावना

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून, घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिस्स्याचे प्रमाण १००% आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिस्स्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने देशातील १११ आकांक्षित जिल्हयांमध्ये “Transformation of Aspirational Districts” हा कार्यक्रम हाती घेतला आहे. या कार्यक्रमांतर्गत निवडण्यात आलेल्या महाराष्ट्रातील उस्मानाबाद, वाशिम, गडचिरोली व नंदुरबार या चार जिल्हयामध्ये कृषी कल्याण अभियान राबविण्यासाठी, कृषी यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत, केंद्र हिस्सा रु.८०० लक्ष व राज्य हिस्सा रु. ५३३.३३ लक्ष असा एकूण रु.१३३३.३३ लक्ष रक्कमेचा कार्यक्रम संदर्भाधीन दिनांक १२ जून, २०१८ च्या पत्रान्वये मंजूर केला आहे. त्यानुषंगाने सदर कार्यक्रमास संदर्भाधीन दिनांक २७ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, प्रशासकीय मान्यता प्रदान करुन, सर्वसाधारण प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा रु.६०० लक्ष राज्य हिस्सा रु. ४०० लक्ष असा एकूण रु. १००० लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत केलेला आहे. अनुसूचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिस्स्याचा रु.१०० लक्ष समरुप राज्य हिस्सा रु.६६.६७ लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिस्स्याचा रु. १०० लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु.६६.६७ लक्ष असा एकूण रु.३३३.३४ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

१. या शासन निर्णयान्वये, कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाची अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्याकरीता रु ३३३.३४ लक्ष निधी ( रु.तीन कोटी तेहतीस लाख चौतीस हजार फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधीपैकी केंद्र हिस्स्याचा रु.१०० लक्ष (रु.एक कोटी ) व समरुप राज्य हिस्स्याचा रु.६६.६७ लक्ष (रु.सहासष्ठ लक्ष सदुसष्ठ हजार )असा एकुण रु.१६६.६७ लक्ष (रु.एक कोटी सहासष्ठ लाख सदुसष्ठ हजार) निधी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी व केंद्र हिस्स्याचा रु.१०० लक्ष (रु.एक कोटी ) व राज्य हिस्स्याचा रु.६६.६७(रु.सहासष्ठ लक्ष सदुसष्ठ हजार ) लक्ष असा एकुण रु. १६६.६७ लक्ष (रु.एक कोटी सहासष्ठ लाख सदुसष्ठ हजार) निधी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी खर्च करण्यांत यावा

३. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु.३३३.३४ लाख निधी खालील लेखाशीर्षाखाली चालू वर्षी अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | प्रवर्ग | केंद्र | राज्य |
|---|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | मागणी क्रमांक:- डी-३<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७८९-अनुसूचित जाती उपयोजना<br>(००) (१३) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो)<br>(केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जाती उपयोजना ) (२४०१ A ३०५)<br>३३ अर्थसहाय्य. | . मागणी क्रमांक:- डी-३<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७८९-अनुसूचित जाती उपयोजना<br>(००) (१४) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो)<br>(राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती उपयोजना ) (२४०१ A३१४) ३३ अर्थसहाय्य. |
| २ | अनुसूचित जमाती | मागणी क्रमांक:- टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना<br>(०१) (११) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो),<br>(२४०१ A ४५९)<br>३३ अर्थसहाय्य (केंद्र हिस्सा) | मागणी क्रमांक:- टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना<br>(०१) (१०) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो),<br>(२४०१ A ४४१)<br>३३ अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ) |

४. या उप अभियानाकरीता वितरीत करण्यांत आलेला निधी वार्षिक कृति आराखडयात मंजुर केलेल्या बाबींवर अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीच खर्ची टाकावा तसेच ,अनुदानाची रक्कम त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर PFMS प्रणालीद्वारे जमा करावी.

५. सदर कार्यक्रम राबविताना संदर्भाधीन अ.क्र.१ येथील कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन अनु.क्र.२ येथील दि.२७ एप्रिल, २०१८ च्या उन्नत शेती समृध्द शेतकरी अभियानाच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व संदर्भाधीन अ.क्र.५ येथील आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / प्रकियाचे / वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / C.V.C. तत्वानुसार /प्रचलित शासन निर्णय / नियम / परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम / अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

७. कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या उदिष्ट पूर्तीसाठी, संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उदिष्टनिहाय अमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत केंद्र शासनास सादर करावा. सदर अहवाल सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक / आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळयाने सादर होईल, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

८. सन २०१८-१९ मध्ये राज्यात सदर अभियानाची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, निधी आहरण व संवितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यता येत आहे :-

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी. | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८ मधील अटींची पुर्तता करुन सदर परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन तसेच आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व सामाजिक न्याय विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१९१७१०११७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.07.19 17:10:54 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि), मंत्रालय, मुंबई-३२

२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
५. प्रधान सचिव , सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
६. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त (समाजकल्याण ), समाजकल्याण आयुक्तालय,पुणे
९. आयुक्त (आदिवासी विकास ), आदिवासी विकास, आयुक्तालय, नाशिक
१०. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
११. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
१२. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
१३. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
१५. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१७. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई-३२
१८.मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१९.मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२०. निवड नस्ती (कार्यासन -१४-अे)